**राज्यातील आरक्षण आंदोलनादरम्यान झालेल्या हिंसक घटना व तत्सम बाबींची चौकशी करण्यासाठी एसआयटी (SIT) स्थापन करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-०३२४/प्र.क्र.३९/विशा १-अ**
दुसरा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ मार्च, २०२४

**<u>प्रस्तावना</u> :-**

महाराष्ट्र विधान मंडळाच्या सन - २०२४ च्या पहिल्या (अर्थसंकल्पीय) अधिवेशनामध्ये दिनांक २७.०२.२०२४ रोजी राज्यातील आरक्षण आंदोलनातील हिंसा पूर्व नियोजित होती किंवा कसे, या विषयाची चर्चा झाली. सदर चर्चेच्या अनुषंगाने मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांनी, “प्रकरणाची एसआयटी मार्फत सखोल चौकशी करावी” असे निर्देश दिले आहेत. सदर निर्देशाच्या अनुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांनी दिलेल्या निर्देशाप्रमाणे “राज्यातील आरक्षण आंदोलनादरम्यान गेल्या काही महिन्यात झालेल्या हिंसक घटना व तत्सम बाबींची” सखोल चौकशी करण्याकरीता **श्री. संदिप कर्णिक (भापोसे), पोलीस आयुक्त, नाशिक शहर** यांच्या अध्यक्षतेखाली **“विशेष तपास पथक (SIT)”** गठीत करण्यास मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांनी मान्यता दिली आहे.

उपरोक्त विशेष तपास पथकाने चौकशी करतांना राज्यात आरक्षणाविषयी विविध ठिकाणी आंदोलने सुरु असतांना आंदोलनाचा गैरफायदा घेऊन सामाजिक सलोखा/वातावरण अस्थिर करण्यासाठी जाळपोळ, दगडफेकी सारख्या हिंसक घटना जाणिवपूर्वक करण्याचा प्रयत्न करणे तसेच मिडिया, सोशल मिडियाचा गैरवापर करुन चुकीची माहिती देऊन तसेच अफवा पसरवून दंगे भडकविण्याचा प्रयत्न करणे, या व इत्यादी बाबींसंदर्भात चौकशी/तपास करुन तीन महिन्यात शासनास अहवाल सादर करावा.

सदर <u>तपास</u> पथकामध्ये निमंत्रित सदस्य म्हणून तज्ञ व्यक्तींना बोलविण्याचे अधिकार विशेष तपास पथकाचे प्रमुख यांना राहतील. तसेच, सदर विशेष तपास पथकासाठी आवश्यक मनुष्यबळ शासनाच्या सहमतीने नियुक्त करण्याचे अधिकार विशेष तपास पथक प्रमुख यांना राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१११६३४४१४१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

RAJESH SHALIGRAM GOVIL

Digitally signed by RAJESH SHALIGRAM GOVIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0ED8916DB8E68105B4125438A1606D0F12978EECB0C9464E868A33D64327201B, cn=RAJESH SHALIGRAM GOVIL
Date: 2024.03.11 16:44:04 +05'30'

**( राजेश गोविल )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा. उपमुख्यमंत्र्याचे सचिव

४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिक्षद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व सन्माननीय संसद, विधानसभा, विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई
९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) श्री. संदिप कर्णिक (भापोसे), पोलीस आयुक्त, नाशिक शहर.
११) निवडनस्ती (विशा-१-अ)